सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) खरेदी करण्यास मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२२/प्र.क्र.०९/का.६

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : - १० मार्च, २०२२

**वाचा :-** (१) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१७/प्र.क्र.३४८/का.६, दिनांक ३० जून, २०१८,

(२) केंद्र शासन महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.CD-II-१५/३/२०२० CD-II (e-९०२१७), दिनांक २६ नोव्हेंबर,२०२१.

(३) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र जा.क्र.एबाविसेयो/का-४/ पु.शा.शि. संच खरेदी /२०२१-२२/९४, दिनांक १२ जानेवारी,२०२२

(४) महिला व बाल विकास विभाग, पत्र क्र.एबावि-२०२२/प्र.क्र.०९/का.६, दिनांक ०४ फ़ेब्रुवारी,२०२२

(५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र जा.क्र.एबाविसेयो/का-४/ शालेय शिक्षण संच/२०२२/९१६, दिनांक ०८ मार्च,२०२२.

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागामार्फत एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत ० ते ६ वर्षे वयोगटातील बालके, तसेच किशोरवयीन मुली, गरोदर व स्तनदा माता इत्यादी लाभार्थ्यांना लसीकरण, पुरक पोषण आहार, आरोग्य तपासणी, पुर्व प्राथमिक शिक्षण, संदर्भ सेवा, आहार व आरोग्य शिक्षण इ. सेवा पुरविण्यात येतात. अंगणवाडीत येणाऱ्या ३ वर्षे ते ६ वर्षे वयोगटातील बालकांचे बौध्दिक, शारिरीक, भावनिक, सामाजिक, भाषा वैयक्तिक तसेच सृजनशील सर्वांगीण विकास होण्यासाठी आवश्यक साहित्य कसे असावे याबाबत केंद्र शासनाचे पत्र दि. ३ जानेवारी, २०१४ व ७ सप्टेंबर, २०१७ च्या पत्रान्वये मार्गदर्शक सूचना दिलेल्या आहेत. अंगणवाडी केंद्रास आकार बाल शिक्षण क्रमामध्ये दिलेल्या वाचन, लेखन, गणन, पुर्वानुभव, कलानुभव, भाषानुभव, शारिरीक व विकासानुभव, परिसर परिचय व विज्ञानुभव यावर आधारित खेळ व शैक्षणिक साहित्य पुरविणे आवश्यक आहे. एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात सर्व अंगणवाडयांमधील मुलांसाठी पुर्व शालेय शिक्षण संच या बाबीसाठी केंद्र शासनाने रुपये ५५२४.३० लाख एवढा APIP मंजूर केलेला आहे. त्यानुसार पूर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) खरेदी करण्याचे प्रस्तावित आहे.

२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी अंगणवाडी केंद्रातील लाभार्थ्यांना पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) पुरविण्यासाठी दिनांक ०९.०२.२०२२ रोजी ई-निविदा प्रकाशित केली असून त्या अंतर्गत मे. मननील ट्रेडकॉम प्रा. लि. गोरेगाव, मुंबई या निविदाधारकांचे दर इतर निविदाधारकांच्या दराच्या तुलनेने कमी म्हणजे रुपये ४,८४२/- प्रति संच असल्याने ते L1 निविदाधारक

म्हणून घोषित झालेले असल्याचे नमूद करण्यात आलेले आहे. त्यानुसार अंगणवाडी केंद्र व मिनी अंगणवाडी केंद्रामधील मुलांसाठी L१ निविदाधारक मे. मननील ट्रेडकॉम प्रा. लि. गोरेगाव, मुंबई यांचेकडून रु.५३,४९,७३,२१२/- (अक्षरी रुपये त्रेपन्न कोटी एकोणपन्नास लाख त्र्याहत्तर हजार दोनशे बारा फक्त) एवढया रक्कमेची पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) खरेदी करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केलेला आहे. त्या प्रस्तावाच्या अनुषंगाने पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) खरेदी करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत राज्यातील सर्व अंगणवाडी केंद्रांना पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) उपलब्ध करुन देण्यासाठी मे. मननील ट्रेडकॉम प्रा. लि. गोरेगाव, मुंबई या L१ निविदाधारकाकडून रु. ५३,४९,७३,२१२/- (अक्षरी रुपये त्रेपन्न कोटी एकोणपन्नास लाख त्र्याहत्तर हजार दोनशे बारा फक्त) एवढया रक्कमेची खरेदी करण्यास व त्यासाठीच्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे. :-

| अ. क्र. | L१ निविदा-धारकाचे नांव | साहित्याचे नांव | प्रकल्पाचा प्रकार | अंगणवाडी केंद्राची संख्या | खरेदी करावयाच्या PSE Kitsची एकुण संख्या | प्रति संच किंमत (सर्व करासहित) | एकुण खरेदीची किंमत |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | मे. मननील ट्रेडकॉम प्रा. लि. गोरेगाव, मुंबई | पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) | ग्रामीण/ आदिवासी | ८१८७६ अं. केंद्र | ८१८७६ | रु ४,८४२/- | रु.४५९४४२८५४ |
| | | | | १३०११ मिनी अं. केंद्र | १३०११ | | |
| | | | **एकुण अ** | | **९४८८७** | | **रु. ४५९४४२८५४** |
| | | | नागरी | १५५५९ अं. केंद्र | १५५५९ | | रु.७५५३०३५८ |
| | **एकूण ग्रामीण/ आदिवासी + नागरी** | | | | **११०४८६** | **रु. ४,८४२/-** | **रु.५३,४९,७३,२१२/-** |

**२. पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) चा पुरवठा आदेश खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून निर्गमित करण्यात यावा.**

१) सदर खरेदी करतांना ई-निविदेतील अटी व शर्तीची पूर्तता करण्याची तसेच ई-निविदेत स्पष्ट केल्याप्रमाणे (Specification प्रमाणे) पुरवठा केला जाईल याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी घ्यावी.

२) सदरचा निधी शासनाच्या विहित धोरणानुसार व कार्यपध्दतीनुसार तसेच उपलब्धतेनुसार खर्च करणे आवश्यक राहील, याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांची राहील.

३) सन २०२१-२२ हे आर्थिक वर्ष संपण्यास अल्प कालावधी शिल्लक असल्याने पूर्व शालेय शिक्षण संचाचा पुरवठा जिल्हास्तरावर करण्यास व तदनंतर निविदेत दिलेल्या कालावधीमध्ये निविदाधारकाकडून सदर संच ५५३ प्रकल्प स्तरावर विनामूल्य पोहोच करण्याच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत असून त्यानुषंगाने याबाबतची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी घ्यावी. पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) खेळणी साहित्य पुरवठा मंजूर तरतूदीतून विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावा

४) पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) खेळणी साहित्य पुरवठा केलेल्या बाबीवर आयसीडीएस अंतर्गत वापरासाठी / शासनामार्फत पुरवठा असा शिक्का मारलेला किंवा लेबल लावलेला असावा. पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) खेळणी साहित्य वाटप/ पुरवठा व खर्च यामध्ये अनियमितता झाल्यास वा लेखा आक्षेप उद्भवल्यास त्याची जबाबादारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांची राहील.

५) पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) खेळणी साहित्याचा लाभ लाभार्थ्यांना पोहचावा, यादृष्टीने स्वयंस्पष्ट माहिती अंगणवाडीतील नोंदवहीमध्ये उत्पादनाचा दिनांक / एकूण पुरवठा / एकूण उपयोग याबाबतची योग्य नोंद ठेवणे, इत्यादी बाबत उचित मार्गदर्शक सूचना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी द्याव्यात.

६) सदर आदेशानुसार प्रत्यक्षात पुरवठा झालेला आहे, याची खात्री झाल्यावरच जेवढया जिल्हयांचा पुरवठा पुर्ण झालेला असेल व त्यांची पुरवठा झाल्याची चलने प्राप्त झालेली असतील त्या जिल्हयांची देयक अदा करण्यात यावीत. यासाठी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई हे जबाबदार राहतील.

७) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक १ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयातील खरेदी धोरणातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

८) निविदाधारकांनी निविदा भरताना पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) खेळणी साहित्याचा जो नमुना आयुक्तालयास सादर केलेला आहे त्याच साहित्याचा पुरवठा पुरवठाधारकाकडून करण्यात आलेला आहे याची शहानिशा आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी करुन घ्यावी.

३. सदरचा खर्च सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) खेळणी साहित्य या बाबी खाली मंजूर तरतूदीमधून खालील लेखाशिर्षामधून भागविण्यात यावा.:-

**अ) ग्रामीण / आदिवासी प्रकल्पांसाठी** :-

१) मागणी क्र.एक्स-१, २२३६, पोषण आहार, ०२, पोषक अन्न व पेये यांचे वितरण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (००), (००) (०२) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ यांच्या कलम १२३ व २६१ अन्वये एकात्मिक बाल विकास सेवा योजनेसाठी जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदान (स्थानिक क्षेत्र) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम) (२२३६१९७२), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर)

२) मागणी क्र.एक्स-१, २२३६, पोषण आहार, ०२, पोषक अन्न व पेये यांचे वितरण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (००), (००) (०३) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ यांच्या कलम १२३ व २६१ अन्वये एकात्मिक बाल विकास सेवा योजनेसाठी जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदान (स्थानिक क्षेत्र) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) (२२३६१९८१), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर)

**ब) नागरी प्रकल्पांसाठी :-**

१) मागणी क्र.एक्स-१, २२३६, पोषण आहार, ०२, १०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम, (०८) एकात्मिक बाल विकास सेवा योजना प्रकल्प (०८) (०१) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम) (२२३६१९०९), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर)

२) मागणी क्र.एक्स-१, २२३६, पोषण आहार, ०२, १०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम, (०८) एकात्मिक बाल विकास सेवा योजना प्रकल्प (०८) (०२) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) (२२३६१९१८), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर)

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१०१४४१४३४८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
Date: 2022.03.15 14:41:14 +05'30'

**(वि. रा. ठाकूर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,महाराष्ट्र राज्य, रायगड भवन, नवी मुंबई.
२) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(महिला व बाल विकास),जिल्हा परिषद
३) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
५) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई
६) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे
१०) अपर कोषागार अधिकारी, सीबीडी, बेलापूर,नवी मुंबई
११) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
१२) निवड नस्ती -का-६.